राज्यामध्ये ऑक्सिजन प्लांट सुरु करण्यासाठी BHEL प्राधिकरणासाठी दुसऱ्या हप्त्याची रक्कम वितरीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**आपत्ती व्यवस्थापन, मदत व पुनर्वसन**
शासन निर्णय क्र.आव्यप्र-२०२०/प्र.क्र.१०२-अ/आव्यप्र-१
मंत्रालय, मुंबई ३२.
दि. २७ जानेवारी, २०२२

**वाचा:-** शासन निर्णय क्र. आव्यप्र-२०२०/प्र.क्र.१०२-अ/आव्यप्र-१, दि. ०५ ऑक्टोबर, २०२१.

**प्रस्तावना:**

दि. १५ जुन, २०२१ रोजी झालेल्या राज्य कार्यकारी समितीच्या बैठकीत, राज्यातील गंभीर परिस्थितीचा विचार करुन केंद्र शासनाच्या प्राधिकरणाकडून ऑक्सिजन प्लांट लावण्यासाठी खरेदी प्रक्रिया राबविण्याबाबत निर्णय घेण्यात आला. त्या निर्णयान्वये CSIR यांना प्रकल्प व्यवस्थापक म्हणून नियुक्ती करण्यात आली व राज्यामध्ये १० ऑक्सिजन प्लांट उभारण्यासाठी भारत हेवी इलेक्ट्रीकल्स (BHEL) यांना कळविण्यात आले होते. त्यानूसार या केंद्र शासनाच्या कंपन्यांना कार्यादेश देण्यात आले. त्यानूसार संदर्भाधिन शासन निर्णयान्वये BHEL प्राधिकरणास बँक हमीच्या मोबदल्यात प्लांटच्या किंमतीच्या ३०% रु. ०३,८०,४०,०००/- (रु. तीन कोटी ऐंशी लक्ष चाळीस हजार) व प्रकल्प व्यवस्थापक म्हणून CSIR यांना रु. १,१८,०००/- (रु. एक लक्ष अठरा हजार) वितरीत करण्यात आले होते. राज्यामध्ये १० ऑक्सिजन प्लांट (१००० LPM PVSA) त्याची किंमत रु. १२.६८ कोटी आहे. कार्यादेशामध्ये दिलेल्या अटी व शर्तीनूसार दुसऱ्या हप्त्याची ३०% आगाऊ रक्कम BHEL प्राधिकरण (Prior to Dispatch) यांना देण्याचे नमूद केले आहे. त्यानूसार ही रक्कम BHEL प्राधिकरणास वितरीत करण्याबाबची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय:**

आपत्ती व्यवस्थापन अधिनियम, २००५ मधील नियम २२ (२)(L) च्या तरतुदीनुसार आपत्ती व्यवस्थापनासंदर्भात सर्व आर्थिक बाबींवर राज्य शासनास सल्ला देण्याचा अधिकार राज्य कार्यकारी समितीस आहे. त्यामुळे Council of Scientific & Industrial Research (CSIR) यांनी सुचविल्यानूसार BHEL या केंद्रशासनाच्या प्राधिकरणास १० ऑक्सिजन प्लांट लावण्याबाबत राज्य कार्यकारी समितीने मान्यता दिलेली आहे. त्यानुसार BHEL प्राधिकरणास रु. १२.६८ कोटी चे प्रशासकीय आदेश देण्यात आले.

BHEL प्राधिकरणास कार्यादेशात नमूद केल्याप्रमाणे दुसऱ्या हप्त्याची ३०% आगाऊ रक्कम म्हणून रु. ०३,८०,४०,०००/- (रु. तीन कोटी ऐंशी लक्ष चाळीस हजार) वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

सदर निधी संबंधित प्राधिकरणास RTGS/NEFT व्दारे त्यांच्या खाली नमूद केलेल्या बँक खात्यात जमा करण्यात यावे.

| अ.क्र. | प्राधिकरण | बँक खाती |
|---|---|---|
| १ | BHEL | State Bank of India<br>Branch - BHEL Township, Hyderabad- 502032<br>Branch Code - 20075<br>Account Number : 62048154115<br>Bank IFSC Code :SBIN0020075 |

उपरोक्त निधी आहरित करण्यासाठी श्री. अर्जुन पालव, लेखाधिकारी, आपत्ती व्यवस्थापन प्रभाग आणि श्री. संजय धारुरकर, वित्तीय सल्लागार तथा उप सचिव यांना अनुक्रमे आहरण व संवितरण अधिकारी आणि नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

या कामी होणारा खर्च मागणी क्र. सी-६ २२४५, नैसर्गीक आपत्तीच्या निवारणासाठी सहाय्य, ८०० इतर खर्च, (९१)(०२) कोविड १९ चा प्रादुर्भाव रोखण्यावरील खर्च लेखाशिर्ष (२२४५ ४१४१) ३१ - सहायक अनुदाने या लेखाशिर्षांतर्गत सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात प्राप्त तरतुदीतून करण्यात येईल.

सदर आदेश वित्त विभागाच्या सहमतीने अनौपचारिक संदर्भ क्र. ३४५/२०२१/व्यय-९, दि. २६.०८.२०२१ अन्वये दिलेल्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर प्रसिध्द करण्यात आले असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२२०१२७१०५९४४०४१९ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(हितेंद्र दुफारे)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत -

१) उप सचिव, मुख्य सचिव कार्यालय, मंत्रालय, मुंबई.
२) महालेखाकार, महाराष्ट्र-१, मुंबई.
३) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
४) वित्तीय सल्लागार तथा सहसचिव, आपत्ती व्यवस्थापन प्रभाग, मंत्रालय, मुंबई.
५) लेखाधिकारी, आपत्ती व्यवस्थापन प्रभाग, मंत्रालय, मुंबई.
६) निवड नस्ती, आव्यप्र-१.